**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील श्री.प्र. ल. पाटील, उप संचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्याची (सन २०२५) नियतकालिक बदली.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्र.औसुवआ-०३२५/प्र.क्र.४१ (भाग-१)/कामगार-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ जून, २०२५.

**वाचा**:- संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. औसुवआ/ आस्थापना/ गोप.-६०/२, दि.०७.०५.२०२५

**शासन आदेश**:-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (१), (२), (३) व (४) च्या तरतूदीनुसार औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या उप संचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशीस अनुसरून सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | श्री.प्र.ल. पाटील,उप संचालक | ठाणे | पुणे कार्यक्षेत्र क्र.-१ |

२. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन कार्यमुक्त करण्याची कार्यवाही संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांनी तात्काळ करावी. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर विहित मुदतीत रुजू होणे अनिवार्य आहे.

३. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/

१६/ कार्यासन-१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल.** याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

६. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१३१४४९३५६११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BABASAHEB SITARAM SHINDE

Digitally signed by BABASAHEB SITARAM SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC0323A0A674CB4C457CBB6B2C0F8B750E0EE28B3CABD66F127CF1EF467412AE, cn=BABASAHEB SITARAM SHINDE
Date: 2025.06.13 14:50:25 +05'30'

**(बाबासाहेब सि. शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.

**प्रत,**

१) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) संबंधित अधिकारी (संचालनालयामार्फत यांचेमार्फत)
५) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
६) संबंधित सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७) उप सचिव (कामगार-१) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती (कामगार-१).